**नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित आपदग्रस्तांना तातडीने मदत देण्याबाबतचे निर्णय घेण्यासाठी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टंचाई -२०१४ / प्र.क्र. २३३/ म-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ जून ,२०१८

वाचा -

1. **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, समक्रमांक, दिनांक २७.११.२०१४**
2. **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१२/ प्र.क्र.१५७/ म-३, दिनांक ३०.०१.२०१४**
3. **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस - २०१५/ प्र.क्र.४०/ म-३, दिनांक १३.०५.२०१५**

प्रस्तावना -

नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणा-या आपद्ग्रस्त व्यक्तींना द्यावयाच्या मदतीचे दर व निकष संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सन २०१० ते सन २०१५ या कालावधीकरिता निश्चित करण्यात आले होते. केंद्र शासनाने नैसर्गिक आपत्तीमध्ये चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर , त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), टोळधाड, दुष्काळ, ढगफुटी व कडाक्याची थंडी ,कीड हल्ला या आपत्तींचा समावेश केला आहे. सदर मदतीचे दर, राज्य शासनामार्फत अवेळी पाऊस, अतिवृष्टी (शेतीपिकांच्या नुकसानीसह सर्व नुकसान), आकस्मिक आग, समुद्राचे उधाण , वीज कोसळणे या आपत्तींकरिताही लागू करण्यात आले आहेत. या मदतीचे दर व निकष संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सन २०१५ ते २०२० या कालावधीसाठी सुधारित करण्यात आले आहेत. नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमुळे बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना तातडीने मदत देणे शक्य व्हावे यासाठी अशा प्रस्तावांवर निर्णय घेण्याकरिता कायमस्वरुपी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याचा प्रस्ताव मंत्रिमंडळास सादर करण्यात आला होता. या प्रस्तावासंदर्भात दिनांक २९.५.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार कायमस्वरूपी मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय -

राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीच्या (NDRF) च्या मार्गदर्शक सुचनानुसार विहित/अधिसुचित करण्यात आलेल्या चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर , त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), दुष्काळ, ढगफुटी, कडाक्याची थंडी,कीड हल्ला या नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या अपादग्रस्तांना दयावयाच्या मदतीचे दर व निकष संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १३.५.२०१५ अन्वये विहित करण्यात आलेले आहेत. केंद्र शासनाने विहित केलेल्या वरील नैसर्गिक आपत्तीबरोबरच

अवेळी पाऊस, अतिवृष्टी ( शेतीपिकांच्या नुकसानीसह सर्व नुकसान ), आकस्मिक आग, समुद्राचे उधाण, वीज कोसळणे या सारख्या स्थानिक नैसर्गिक आपत्तीमध्येही बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधीच्या दरानुसार मदत देण्याचे शासनाचे धोरण संदर्भाधीन दिनांक ३०.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहे.

२. चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर , त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), दुष्काळ, ढगफुटी , कडाक्याची थंडी व किड हल्ला या अधिसुचित केलेल्या नैसर्गिक आपत्तीमध्ये तसेच राज्य शासनाने दिनांक ३०.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या धोरणानुसार अवेळी पाऊस, अतिवृष्टी, समुद्राचे उधाण, आकस्मिक आग व वीज कोसळणे या स्थानिक नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये होणारे व्यक्तींचे मृत्यु/जखमी, घरांची अंशत:/पूर्णत: पडझड, घरातील सामानाचे नुकसान, पशुधनांचा मृत्यू या प्रकरणी NDRF च्या दरानुसार जिल्हास्तरावरून संबंधित बाधितांना तातडीने मदत वाटप केले जाण्यासाठी आवश्यक निधी संबंधित लेखाशीर्षाखाली वर्षाच्या सुरूवातीस संबंधित जिल्हाधिकारी यांना या विभागामार्फत वितरित करण्यात यावा व त्यामधून व्यक्तींचा मृत्यु/जखमी, घरांची अंशत:/पूर्णत: पडझड, घरातील सामानाचे नुकसान, पशुधनांचा मृत्यू या प्रकरणी NDRF च्या निकषानुसार व दरानुसार जिल्हास्तरावर तातडीने मदतीचे वाटप करण्यात यावे.

३. वर नमूद करण्यात आलेल्या नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये आपत्तीमध्ये तसेच अवेळी पाऊस, अतिवृष्टी, समुद्राचे उधाण यासारख्या स्थानिक नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये होणारे शेतीपिकांचे नुकसान, जमीन खरडून जाणे, जमीन वाहून जाणे, मच्छिमारांचे नुकसान व विहित दराने मदत अनुज्ञेय असलेल्या इतर प्रकरणी मदत देण्याबाबतचा निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे कायमस्वरुपी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे:

| अ.क. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री, मदत व पुनर्वसन | अध्यक्ष |
| २ | मा. मंत्री, वित्त | सदस्य |
| ३ | मा. मंत्री, सहकार | सदस्य |
| ४ | मा. मंत्री, ग्रामविकास | सदस्य |
| ५. | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ६. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (कृषी) | सदस्य |
| ७. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) | सदस्य |
| ८. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (मदत व पुनर्वसन) | सदस्य सचिव |

**३. मंत्रीमंडळ उपसमितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील:**

**१)** चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर , त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), दुष्काळ, ढगफुटी , कडाक्याची थंडी, किड हल्ला व वीज कोसळणे या अधिसुचित केलेल्या नैसर्गिक

आपत्तीमध्ये तसेच राज्य शासनाने दिनांक ३०.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या धोरणानुसार अवेळी पाऊस, अतिवृष्टी, समुद्राचे उधाण, आकस्मिक आग या स्थानिक नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये होणारे व्यक्तींचे मृत्यु/जखमी, घरांची अंशत:/पूर्णत: पडझड, घरातील सामानाचे नुकसान, पशुधनांचा मृत्यू या प्रकरणी NDRF च्या दरानुसार जिल्हास्तरावरून संबंधित बाधितांना तातडीने मदत वाटप केले जाण्यासाठी आवश्यक निधी संबंधित लेखाशीर्षाखाली वर्षाच्या सुरूवातीस संबंधित जिल्हाधिकारी यांना या विभागामार्फत वितरित करण्यात यावा व त्यामधून व्यक्तींचा मृत्यु/जखमी, घरांची अंशत:/पूर्णत: पडझड, घरातील सामानाचे नुकसान, पशुधनांचा मृत्यू या प्रकरणी NDRF च्या निकषानुसार व दरानुसार जिल्हास्तरावर तातडीने मदतीचे वाटप करण्यात यावे. यासाठी मंत्रिमंडळ उपसमितीच्या मान्यतेची आवश्यकता राहणार नाही.

**२)** चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर , त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), दुष्काळ, ढगफुटी,कडाक्याची थंडी, किड हल्ला व वीज कोसळणे यासारख्या अधिसुचित नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतीपीकांचे , शेतजमीनींचे, मच्छिमारांच्या व छोटया कारागिरांच्या होणाऱ्या नुकसानी प्रकरणी या विभागास प्राप्त होणाऱ्या प्रस्तांवावर निर्णय घेवून NDRF च्या निकषानुसार व दरानुसार मदत मंजूर करण्याचे अधिकार मंत्रिमंडळ उपसमितीस राहतील. अधिसुचित नैसर्गिक आपत्तीमध्ये आपदग्रस्तांना मंजूर करावयाचे मदतीचे निकष व दर शासन निर्णय दिनांक १३.५.२०१५ अन्वये निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यामुळे अधिसूचित नैसर्गिक आपत्तीमध्ये शासनाने विहित केलेल्या दरानुसार अपादग्रस्तांना मदत मंजूर करण्याबाबतचे निर्णय घेण्याचे अधिकार मंत्रिमंडळ उपसमितीस राहतील. मंत्रिमंडळ उपसमितीने मदतीबाबतचा निर्णय घेतल्यानंतर पुन्हा त्यास वित्त विभागाच्या मान्यतेची आवश्यकता असणार नाही.

**३)** मानव निर्मित आपत्तीमध्ये (दंगल, दहशतवाद,बॉम्बस्फोट व नक्षलवादी कारवाया ) विशेष सहाय्य करणे तसेच शासन निर्णय दिनांक ३०.१.२०१४ अन्वये राज्य शासनाने घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार अवेळी पाऊस,अतिवृष्टी, समुद्राचे उधाण, यासारख्या स्थानिक नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमध्ये तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये न येणाऱ्या इतर प्रकरणी होणाऱ्या शेतीपिकांच्या,शेतजमिनीच्या व इतर नुकसानीप्रकरणी आपदग्रस्तांना/बाधितांना मदत देण्यासाठी अशा मदतीची प्रकरणे प्रथमत: वित्त विभागास सादर करून त्यांचे अभिप्राय प्राप्त करून घेतल्यानंतर मंत्रिमंडळ उपसमितीस निर्णयार्थ सादर करण्यात येतील व मंत्रिमंडळ उपसमितीच्या निर्णयानुसार मदतीचे वाटप करण्यात येईल.

**४)** पाणी टंचाईच्या कालावधीमध्ये टंचाईग्रस्त गावांतील नागरिकांना व पशुधनांना पिण्याचे पाणी उपलब्ध होण्यासाठी पाण्याचा उद्भव निर्माण करण्यासाठी व लोकांना पिण्याचे पाणी उपलब्ध होण्यासाठी उपसा सिंचन योजनांचा उपयोग झाला असल्यास केवळ घोषित केलेल्या टंचाईच्या कालावधीतील अशा योजनांची चालू विद्युत देयकांची रक्कम मदत व पुनर्वसन विभागाच्या तरतूदीमधून अदा करण्याबाबतचे निर्णय घेण्यासाठी असे प्रस्ताव प्रथमत: वित्त विभागास सादर करून

त्यांचे अभिप्राय प्राप्त करून घेण्यात यावेत. तदनंतर वित्त विभागाच्या अभिप्रायासह असे प्रस्ताव मंत्रिमंडळ उपसमितीस निर्णयार्थ सादर करण्यात येतील व मंत्रिमंडळ उपसमितीच्या निर्णयानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

५) वरील परिच्छेद क्रमांक ४ मधील प्रयोजनासाठी या विभागाकडील २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, या प्रधान लेखाशीर्षाखाली स्वतंत्र लेखाशीर्ष उघण्यात यावे व त्यामध्ये अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१०२५४२०८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Vijay Marotrao Nandekar

Digitally signed by Vijay Marotrao Nandekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77eb3263d1e0e790641287f679612e3f1a8f57c79815a39be6e16e1ca50c9976, cn=Vijay Marotrao Nandekar
Date: 2018.06.13 10:25:09 +05'30'

**( वि.मा.नांदेकर )**

**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता),मंत्रालय,मुंबई,
७. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१२. संचालक, लेखा व कोषागारे,मुंबई,
१३. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१४. मा.मंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

१६. मा.मंत्री (ग्रामविकास ), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
२०. निवड नस्ती (कार्यासन/ म-७ )